**सामाजिक वनीकरणांतर्गत पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामुहिक जमिनीवर वृक्षलागवड- सन २०१०-११ करिता प्रशासकीय व वित्तिय मान्यता आणि लेखा अनुदान वितरणास मंजुरी.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलएफ-२०१० / प्र.क्र.३७ / जल-१२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १६ एप्रिल,२०१०**

**संदर्भ :-**

१) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र जलसं-१०९२/प्र.क्र.१८२/ जल-७, दि. ५.८.१९९२

२) ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय क्र.एसएलएफ-२००८/प्र.क्र.३७/ जल-१२, दि. १०.४.२००८ व दि. १३.५. २००८

३) संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/चाबा/ पावक्षे/१/१०-११/२१/१०-११, दि. ३.४.२०१०.

४) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.असक-२००९/प्र.क्र३२/जल-११, दि. ८ एप्रिल,२०१०.

**प्रस्तावना :**

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरीता सामाजिक वनीकरणांतर्गत पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक / सामुहिक जमिनीवर वृक्षलागवड हा कार्यक्रम राज्यात १९९३-९४ पासून राबविण्यात येत आहे. ही योजना सन २००९-१० मध्ये राबविण्यास संदर्भाधीन दिनांक १० एप्रिल, २००८ व १३ मे, २००८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. सदर योजना सन २०१०-११ या आर्थिक वर्षात चालू ठेवण्याची तसेच त्याकरीता अनुदान वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सामाजिक वनीकरणांतर्गत पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक / सामुहिक जमिनीवर वृक्षलागवड हा कार्यक्रम सन २०१०-११ या आर्थिक वर्षात पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१०-११ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागांमार्फत राबविण्यात येणा-या **पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक / सामुहिक जमिनीवर वृक्षलागवड** या योजनेकरिता रु. ५.०० लाख नियतव्यय उपलब्ध झाला आहे. हा नियतव्यय मार्च, २०१० च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात अर्थसंकल्पित झाला आहे. या अर्थसंकल्पित निधीपैकी लेखानुदाना साठी रु. ८३,००० /- एवढा निधी प्रस्तावित करण्यात आला होता. महाराष्ट्र विनियोजन ( लेखानुदान ) विधेयक २०१० (सन२०१० चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक -४) हा पारित झाला असल्याने लेखानुदानाच्या तरतुदी आता वितरणासाठी उपलब्ध आहेत. त्यामुळे पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामुहिक जमिनीवर वृक्ष लागवड ह्या कार्यक्रमाला सन २०१०-११ याआर्थिक वर्षात प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत असून, माहे एप्रिल व मे २०१० ह्या पहिल्या दोन महिन्याच्या खर्चाकरिता रु. ८३,००० /- इतका निधी वितरित करण्यास शासन मंजूरी देत आहे

३. सन २०१०-११ या आर्थिक वर्षातील माहे एप्रिल ते मे ,२०१० या पहिल्या दोन महिन्यांकरीता या योजनेवर खर्च करण्याकरीता रु. ८३,००० /- इतका निधी ( रुपये त्र्याऐंशी हजार फक्त ) संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना अधिनस्त ठेवण्यात येत आहे.त्यांनी सदरहू कार्यक्रमाची अंमलबजावणी प्रचलीत अटी व शर्तीच्या अधिन राहून करावी.

४.	सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी हे संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे राहतील. सदरहू निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. उपरोक्त निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास संचालक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. जिल्हानिहाय तरतुद वितरणाची माहिती शासनास पाठविण्यात यावी. राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा व झालेल्या खर्चाचा तपशील शासनास सादर करावा

५.	सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.एल-३, २४०६ वनीकरण व वन्यजीवन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना-१०२, सामाजिक व क्षेत्र वनीकरण ( ०४) नागरी वनीकरण (०४) (०४) पाणवहाळ क्षेत्रातील वनेतर सार्वजनिक/सामुहिक जमिनीवर वृक्ष लागवड (२४०६ २३०१) - ३३ अर्थसहाय्य योजनांतर्गत - दत्तमत**

६.	वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र.अंदाज- २०१० /सीआर -६५/अर्थसंकल्प-३, दिनांक ३ एप्रिल, २०१० अन्वये दिलेल्या अधिकारानुसार आणि प्रशासकिय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तिनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०१००४१६१९५९०८००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( वि. रा. ठाकूर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,
संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व सहसंचालक , सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
कार्यासन अधिकारी, व्यय-१५,अर्थसंकल्प ३ व ४, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.१४३२, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व) , ग्रा.वि.व ज.सं.वि.,मंत्रालय,मुंबई-३२
निवडनस्ती/जल-१२.